महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः एसआरव्ही २०१४/व्हीआयपी २९३/प्र.क्र.३६२/१२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०९/१२/२०१४

वाचा :-**शासन परिपत्रक क्र. एसआरव्ही २०१४/व्हीआयपी २८४/प्र.क्र.३६२/१२, दि.२६.११.२०१४.**

## शासन परिपत्रक

शासनाने गतिमान, पारदर्शक आणि जबाबदार प्रशासनाची बांधिलकी विचारात घेऊन, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार, शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या बदल्या करण्याचे अधिकार क्षेत्रिय स्तरावरुन विभागीय आयुक्त, मुख्य अभियंता व इतर विभागप्रमुख यांना प्रदान करण्याबाबतच्या सूचना या विभागाच्या शासन परिपत्रक, दि.२६.११.२०१४ अन्वये सर्व प्रशासकीय विभागांना देण्यात आल्या आहेत.

२. त्याअनुषंगाने सर्व मंत्रालयीन विभागांना कळविण्यात येते की, उपरोक्त अधिकारांचा वापर करीत असताना, कायद्याचे काटेकोरपणे पालन केले जाईल याची दक्षता घ्यावी. ही दक्षता घेतली जात आहे किंवा नाही याबाबत वरिष्ठ स्तरावरुन नियंत्रण ठेवण्यात येत आहे. या आदेशांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात कसूर झाल्याचे निदर्शनास आले तर संबंधितांविरुध्द तातडीने कडक शिस्तभंगाची कार्यवाही सुरु केली जाईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

३. संदर्भीय आदेशान्वये सूचित केल्यानुसार, बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित केल्याबाबत निर्गमित केलेल्या आदेशाची प्रत सर्व संबंधित सक्षम अधिका-यांना देण्यात यावी व निर्गमित केलेल्या आदेशांची प्रत संबंधित मंत्रालयीन विभागाच्या विभाग प्रमुखांकडे देखील पाठवावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१११२३६५३२२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2014.12.15 11:46:10 +05'30'

**(भगवान सहाय)**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२) सर्व मा. मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

३) मा.मुख्य सचिव,
४) सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
५) सर्व मंत्रालयीन विभाग,
६) निवड नस्ती.